**राज्यातील बीज परिक्षण प्रयोगशाळा, खत नियंत्रण प्रयोगशाळा, किटकनाशके चाचणी प्रयोगशाळा व किडनाशके उर्वरित अंश तपासणी प्रयोगशाळांच्या बळकटीकरणासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनंतर्गत प्रकल्प राबविण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,

शासन निर्णय क्रमांक : किनाप्र-२०१०/ ५८७/ प्र.क्र.१६२/१४-अे.

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२

दिनांक : ४ मार्च, २०११.

**संदर्भ** : १. शा. निर्णय क्र. राकृवि-२००९/ प्र.क्र.-७८/राकृवियो कक्ष, दि.१.८.२००९

२. शा. निर्णय क्र. राकृवि-२००९/प्र.क्र.-१०२ /राकृवियो कक्ष, दि.२२.१.२०१०

३. शा. नि. कृषि व पदुम विभाग क्रमांक : किनाप्र-२०१०/प्र.क्र.८३/१४ अे. दि. ५/८/१०

४. शा. निर्णय क्र.राकृवि-२०१०/प्र.क्र.-५२/राकृवियो कक्ष, दि.१३.०९.२०१०

४. कृषि आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्र./कृ.आ./गु.नि.-६/राकृवियो/१०१०६/७४२/२०१० दि- २६/८/१० व दिनांक १४.१२.२०१०

**प्रस्तावना** :

राष्ट्रीय कृषि विकास योजेने अंतर्गत " राज्यातील गुणवत्ता नियंत्रण व किडनाशके उर्वरित अंश तपासणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे " या प्रकल्पांतर्गत रु.२०८३.०० लक्ष निधी मंजुर करण्यात आला. तथापि त्यापैकी सन २००९-१० या आर्थिक वर्षात रु. १०००.०० लक्ष रक्कमेस संदर्भिय क्र १ व २ नुसारच्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय मान्यता तसेच निधी वितरित करण्यात आला होता. उर्वरित रु.१०८३.०० लक्ष रक्कमेचा कार्यक्रम सन २०१०-११ मध्ये राबविणेसाठी संदर्भिय शा.नि. ३ अन्वये प्रशासकिय मान्यता देण्यात आली आहे. तथापि राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने दिलेली मान्यता विचारात घेऊन एकुण ऱक्कम रु. २०८३.०० लक्ष कार्यक्रमास सुधारित प्रशासकीय मान्यता तसेच या. कार्यक्रमाच्या अंमलबजावणी संदर्भातील सविस्तर कार्यप्रणाली, तांत्रिक मान्यता, बाबनिहाय किंमत, भौतीक व आर्थिक लक्षांक ईत्यादीना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यात बीज परिक्षण प्रयोगशाळा-(३), खत नियंत्रण प्रयोगशाळा, (४),किटकनाशके चाचणी प्रयोगशाळा, (४) तसेच किडनाशके उर्वरित अंश तपासणी प्रयोगशाळा,(२) अशा एकुण १३ प्रयोगशाळा कार्यान्वीत आहेत. या प्रयोगशाळांपैकी १० प्रयोगशाळांना राष्ट्रीय मानांकन (एनअेबीएल ॲक्रीडीटेशन) मिळविणे, तसेच ३ बिज परिक्षण प्रयोगशाळांकरीता ईस्टा या संस्थेचे आंतरराष्ट्रीय मानांकन मिळविणे व या सर्व प्रयोगशाळांमध्ये नमुने तपासणीसाठी अत्याधुनिक सुविधा निर्माण करण्याकरिता सोबत जोडलेल्या परिशिष्ट १ मध्ये नमूद केलेला कार्यक्रम रु.१०८३.०० लक्ष सन २०१०-११ मध्ये राबविण्यास परिशिष्ट २ मधील अटी व शर्तीच्या अधिन राहून परिशिष्ट ३ मधील प्रयोगशाळा बळकटीकरणाकरता आवश्यक उपकरणांना मान्यता देण्यात येत आहे.

राष्ट्रीय कृषि विकास योजनांतर्गत सन २००९-१० मध्ये राबविण्यात आलेल्या रु. १०००.०० लक्ष रक्कमेसह एकुण रु. २०८३.०० लक्षचा कार्यक्रम राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राबविण्यास या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय, दि.१५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग ३, अनुक्रमांक ४, परिच्छेद २७.२ अन्वये देण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर www.maharashtra.gov.in येथे उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०१०७१८१६५३००१ असा आहे.

सहपत्र : परिशिष्ट- १ ते ३

(जी. के. राऊत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे-१
महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपुर
कृषि संचालक (निवगुनि), कृषि आयुक्तालय,पुणे
सर्व विभागीय कृषि सह संचालक
कृषि उपसंचालक (प्रयोगशाळा), कृषि आयुक्तालय,पुणे
बीज परिक्षण प्रयोगशाळा-(सर्व),
खत नियंत्रण प्रयोगशाळा, (सर्व),
किटकनाशके चाचणी प्रयोगशाळा, (सर्व )
किडनाशके उर्वरित अंश तपासणी प्रयोगशाळा,(सर्व)
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,ठाणे,नाशिक,औरंगाबाद,अमरावती व नागपूर
वित्त विभाग/नियोजन विभाग
राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती.

**परिशिष्ठ -१**

**प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे अंतर्गत समाविष्ठ बाबी व खर्च**

र. रु.(लाखात)

| अ. क्र | बाब | परिमाण | लक्ष (२०१०-११) | | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| | | | भौतिक | आर्थिक | |
| १ | प्रयोगशाळेतील विश्लेषकांचे प्रशिक्षण. | विश्लेषक संख्या | १०३ | २.५० | विश्लेषकांचे प्रशिक्षणाकरीता |
| २ | गौणबांधकामे, फर्निचर व विद्युतिकरण. | प्रयोगशाळा संख्या | १३ | ९५.०० | बांधकाम व विद्युतीकरण विभागाकडील अंदाजपत्रका प्रमाणे. |
| ३ | प्रयोगशाळेतील उपकरणांची क्षमतावृध्दी/दुरुस्ती /वार्षिक देखभाल करार. | प्रयोगशाळा संख्या | १३ | २३.२३ | प्रयोगशाळेकडील आवश्यकतेप्रमाणे |
| ४ | अद्यावत उपकरणे उपलब्ध करणे. | उपकरण संख्या | १८४ | ९६२.२७ | प्रयोगशाळेकडील मागणी व तांत्रिक समितीच्या मान्यतेप्रमाणे |
| **एकुण** | | | | १०८३.०० | |

# परिशिष्ठ-२

## राज्यातील गुणवत्ता नियंत्रण प्रयोगशाळा व किडनाशके उर्वरीत अंश तपासणी प्रयोगशाळा बळकटीकरण करणे या योजनेची राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अंमलबजावणी पुढील प्रमाणे राहील.

**अ.) प्रयोगशाळेतील विश्लेषकांना प्रशिक्षण देणे-**

१. राज्यातील गुणवत्ता नियंत्रण व किडनाशके उर्वरीत अंश तपासणी प्रयोगशाळेतील विश्लेषकांची प्रशिक्षणासाठी निवड करणेत यावी.

२. प्रशिक्षण देणारी संस्था हि केंद्र शासन, राज्य शासनाकडील अथवा मान्यता प्राप्त प्रशिक्षण संस्था असावी. यामध्ये तांत्रिक प्रशिक्षणाबरोबरच प्रयोगशाळांचे आय.एस.ओ./एनएबीएल-१७०२५: २००५/ईस्टा ईत्यादी प्रशिक्षणांचा समावेश राहील.

३. सदर प्रशिक्षणासाठी पात्र विश्लेषकांची अंतिम निवड कृषि संचालक (नि.वगु.नि.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावी.

**ब) प्रयोगशाळाकरीता बांधकामे, गौणबांधकामे, फर्निचर व विद्युतीकरण करणे.-**

१. राज्यातील गुणवत्ता नियंत्रण व किडनाशके उर्वरीत अंश तपासणी प्रयोगशाळा करीता बांधकाम विभागाकडील तांत्रिक अंदाजपत्रकाप्रमाणे बांधकाम, गौणबांधकामे व विद्युतीकरण करणे.

२. प्रस्तावित बांधकामापैकी रक्कम रुपये २०.०० लक्ष पेक्षा जास्त असलेल्या प्रस्तावास संयुक्त सचिव समितीची मान्यता घेणेत यावी.

३. प्रयोगशाळेसाठी आवश्यक असलेले फर्निचर विहित केलेल्या खरेदी पध्दतीचा अवलंब करुन उपलब्ध करणेत यावे.

**क) प्रयोगशाळेतील उपकरणांची क्षमतावृध्दी-**

१. प्रयोगशाळा स्तरावरील उपकरणांची तांत्रिक क्षमतावृध्दी व दुरुस्तीची गरज विचारात घेऊन आयुक्तालयाकडे प्रस्ताव पाठविण्यासाठी समिती असणे आवश्यक आहे. त्याकरीता प्रयोगशाळा स्तरावर अधिक्षक कृषि अधिकारी दर्जाच्या अधिका-याच्या अध्यक्षतेखाली संचालक (नि.वगु.नि.) यांनी समिती गठीत करुन सदर समितीने क्षमतावृध्दी/दुरुस्ती/देखभाल करार करणेकरीता आवश्यकते प्रमाणे छाननी करुन प्रस्ताव संचालक (नि.वगु.नि.) यांचेकडे मान्यतेसाठी सादर करावा.

२. सदर समितीने शिफारस केलेल्या प्रस्तावास संचालक (नि.वगु.नि.) यांचेकडून मान्यता देण्यात यावी.

३. प्रस्तावित उपकरणांची क्षमतावृध्दी / दुरुस्ती / देखभाल करार करतांना वित्तिय नियमाच्या अधिन राहुन कार्यवाही करावी.

**ड) अद्यावत उपकरणे उपलब्ध करणे.**

१. राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत प्रस्तावित केलेली व एसएलएससीने मंजूर केलेल्या मुळ प्रस्तावामध्ये नमुद असलेली अद्यावत उपकरणापैकी सोबतचे परिशिष्ठ-३ मध्ये नमूद उपकरणे उपलब्ध अनुदानाचे मर्यादेत खरेदी करावीत.

२. सदर उपकरणांची तांत्रिक प्रमाणके संचालक (नि.व गु.नि.) यांचे अध्यक्षते खाली तांत्रिक समिती गठीत करुन, सदर समितीच्या मान्यतेने अंतिम करावीत.

३. सदर तांत्रिक समितीने मान्यता दिलेल्या उपकरणांची खरेदी विहित खरेदी पध्दतीचा अवलंब करुन करावी.

## <u>परिशिष्ट -३</u>

## राज्यातील गुणवत्ता नियंत्रण प्रयोगशाळा (बियाणे / खते / किटकनाशके) व किडनाशके उर्वरीत अंश तपासणी प्रयोगशाळा बळकटीकरणाकरिता आवश्यक उपकरणे

| अ.क्र. | उपकरणाचे नांव | संख्या | अ.क्र. | उपकरणाचे नांव | संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | ॲटोमिक ॲब्सॉर्पशन स्पेक्ट्रोफोटोमिटर | २ | २३ | हॉट वॉटर बाथ कम शेकर | ३ |
| २ | ॲसीड डिस्पेंन्सर | १६ | २४ | एच. पी. एल. सी. | १ |
| ३ | ॲनालिटीकल बॅलन्स (२२० ग्रॅ) | २ | २५ | आईस फ्लेकींग मशिन | १ |
| ४ | ऑटो पिपेट कंट्रोलर | २९ | २६ | जेलडाल डायजेशन युनिट(२० टयुब्स) | ४ |
| ५ | आटो क्लेव्ह (व्हर्टीकल) | ३ | २७ | लॅमिनार एयर फ्लो कॅबिनेट | ४ |
| ६ | कॅलीब्रेटेड टेस्ट सिव्हज | ४ संच | २८ | मायक्रो पिपेट | १५ |
| ७ | सेंट्रीफ्युज फ्लोअर मॉडेल | १ | २९ | मिक्चर विथ टेंपरेचर कंट्रोंलर | १ |
| ८ | सेंट्रीफ्युज (नॉन रेफरीजरेटेड) | १ | ३० | मॉयश्चर मिटर | १ |
| ९ | कॉन्सट्रेटर विथ | १ | ३१ | मफल फर्नेस | ४ |
| १० | डिप फ्रिज (-८०°सेंटी.) | १ | ३२ | मल्टी पिपेट प्लस | ९ |
| ११ | डिप फ्रिज (-२०° सेंटी) | ३ | ३३ | नॅनो ड्रॉप | १ |
| १२ | डीजिटल ब्युरेट | १४ | ३४ | पीसीआर | २ |
| १३ | इलेक्ट्रॉनिक बॅलन्स | ४ | ३५ | पीएच मिटर | ९ |
| १४ | इलिसा प्लेट रिडर | १ | ३६ | प्रि-ट्रिटमेंट युनिट फॉर वॉटर | २ |
| १५ | इलिसा प्लेट वॉशर | १ | ३७ | जीसी टॉफ | १ |
| १६ | फ्लश पॉईंट ॲपरटस | ४ | ३८ | रेफ्रीजरेटेड सेंट्रीफ्युज (हाय स्पीड) | १ |
| १७ | फ्युम हुड | ६ | ३९ | सीड काऊंटर | १ |
| १८ | जीसीएमएस ट्रिपल क्वाड्रा | २ | ४० | युव्ही स्पेक्ट्रोफोटोमिटर | ३ |
| १९ | जेल डॉक्युमेंटेशन | १ | ४१ | व्हॅक्युम पंप (ऑईल फ्री) | ८ |
| २० | जेल इलेक्ट्रोफोर्सीस | ३ | ४२ | वॉटर प्युरिफिकेशन सिस्टीम | ३ |
| २१ | हॉट एयर ओव्हन | ३ | ४३ | वर्क स्टेशन फॉर डीएनए टेस्टींग | ४ |
| २२ | हॉट प्लेट कम स्टिरर | ४ | | **एकुण** | **१८४** |